**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मध्ये सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात नियुक्ती प्राधिकारी तसेच पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सववि १०१७/प्र.क्र.८३/आस्था १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २८ फेब्रुवारी, २०१७.

वाचा:- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक शाकानि-२०११/प.क्र.२२/१८ (र. व. का), दिनांक ९/३/२०११
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२९०/ कार्या-१२, दिनांक १९/११/२०१६

सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दिनांक १९/११/२०१६ च्या संदर्भाधीन शासननिर्णयान्वये गट -ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांसाठी संबंधित विभागाचे सचिव/विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित केलेले आहे. मात्र पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी कोण असतील याबाबतचे स्वतंत्र आदेश संबंधित प्रशासकीय विभागाने निर्गमित करण्याबाबातच्या सूचना दिल्या आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयास अनुलक्षून नमूद करण्यात येते की, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) मध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग हे तीन उप विभाग असून या तिन्ही उप विभागांसाठी सचिवांचा स्वतंत्र पदभार आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ९/३/२०११ च्या परिपत्रकास अनुसरून, विभागाची आस्थापना ही सहकार सचिवांकडे आहे.

विभागातील सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या (खुद्द) तिन्ही उप विभागातील नियुक्ती प्राधिकारी हे त्या-त्या विभागाचे संबंधित सचिव असतील.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागात सरळसेवेने/ पदोन्नतीने/ प्रतिनियुक्तीने रुजू होणा-या गट ब (अराजपत्रित) आणि गट क या पदांवरील कर्मचारी यांना विभागात नेमणूका / पदस्थापना देण्याच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सहकार-आस्थापना) यांना अन्य सचिवांच्या सल्ल्याने पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागात गट -क (वाहनचालक) आणि गट-ड मधील पदांवर सरळसेवेने, पदोन्नतीने, प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणूका/पदस्थापनेसाठी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सहकार-आस्थापना) यांना पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०३०११७२०५७४८०२ असा आहे. हा शासननिर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2017.03.01 17:22:33 +05'30'

**( मं. ग.जोशी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३. मा. अपर मुख्य सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव (कार्या-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती आस्था १